**केंद्र शासनाच्या मध्यान्ह भोजन योजना (शालेय पोषण आहार) नियमावली २०१५ अंतर्गत विद्यार्थ्यांकरिता भोजन तयार करण्यासाठी केंद्रीय स्वयंपाकगृह बांधण्याकरीता पनवेल महानगरपालिका क्षेत्रातील स.नं. ४८३/१११/१ व सं.नं.४८३/९/३ या सर्वे नंबरपैकी अक्षय पात्र फाउंडेशन संस्थेस सुमारे २००० चौ.मी.जागा रुपये १/- प्रतीवर्षी इतक्या नाममात्र दराने भाडे पट्ट्याने देण्यास मान्यता मिळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पमपा-२२१८/प्र.क्र.३८६/नवि-२३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- ०४ जानेवारी, २०१९

संदर्भ :-

आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांचे पत्र क्र. पमपा/मुख्यालय/१०४८७/२०१८, दिनांक ०५.१२.२०१८

प्रस्तावना : -

आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये **केंद्र शासनाच्या मध्यान्ह भोजन योजना (शालेय पोषण आहार) नियमावली २०१५ ची अंमलबजावणी करणेकरीता** पनवेल महानगरपालिकेच्या क्षेत्रातील १०,००० शालेय विद्यार्थ्यांचे भोजन तयार करून ते वितरीत करण्यासाठी राज्य शासनाने अक्षय पात्र फाउंडेशन या संस्थेची निवड केली असल्याचे तसेच अक्षय पात्र फाउंडेशन संस्थेने पनवेल महानगरपालिकेच्या हद्दीमध्ये उक्त योजनेअंतर्गत अन्न शिजवून वितरीत करण्याकरीता सुमारे २००० चौ.मी. जागा मिळण्याबाबत विनंती केली असल्याचे तद्नुषंगाने पनवेल महानगरपालिका क्षेत्रातील स.नं. ४८३/१११/१ व सं.नं.४८३/९/३ या सर्वे नंबरपैकी अक्षय पात्र फाउंडेशन संस्थेस सुमारे २००० चौ.मी.जागा भूखंड रुपये १/- या नाममात्र दराने द्यावयाचा निर्णय पनवेल महानगरपालिकेच्या महासभेने ठराव क्र. ८६, दिनांक १९.११.२०१८ अन्वये घेतला असल्याचे कळविले आहे.

तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ७९ नुसार सदर भूखंड अक्षयपात्र या संस्थेस रुपये १/- या नाममात्र दराने देण्याकरीता पनवेल महानगरपालिकेने संदर्भाधीन पत्रान्वये शासनाची मान्यता अपेक्षिलेली आहे.

०२. आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांच्या प्रस्तावातील प्राप्त अभिलेख व अधिनियमातील तरतुदीनुसार उक्त प्रकरणी खालील बाबी निदर्शनास येतात:-

i. अक्षय पात्र फाउंडेशन या संस्थेने दिनांक १५.१२.२०१७ च्या पत्रान्वये पनवेल महानगरपालिका क्षेत्रातील शाळेतील विद्यार्थ्यांकरीता १५ ते २०,००० विद्यार्थ्याचे भोजन तयार करण्याकरीता दीड ते दोन एकर जागेची आवश्यकता असल्याचे कळविले आहे.

ii. अक्षय पात्र फाउंडेशन ही संस्था महानगरपालिकेच्या हद्दीतील तत्कालीन पनवेल नगरपरिषद शाळेतील १८६९ विद्यार्थी तसेच ५१ जिल्हापरिषद शाळेतील १४९६ विद्यार्थ्यानां मध्यान्ह भोजन योजना (शालेय पोषण आहार) नियमावली, २०१५ अंतर्गत शालेय विद्यार्थ्यांना मध्यान्ह भोजन उपलब्ध करुन देणार आहे व सदर भोजन तयार करण्यासाठी त्यांना स्वयंपाकगृह निर्माण करणे आवश्यक आहे. केंद्रीय स्वयंपाक गृह स्थापन करण्यासाठी संस्थेने सुमारे दीड ते दोन एकर जागेची मागणी पनवेल महानगरपालिकेकडे केली आहे. या संदर्भातील सामंजस्य करार जानेवारी, २०१९ मा.मुख्यमंत्री महोदयांच्या उपस्थित होणाऱ्या 'महापरिवर्तन' या कार्यक्रमात संबधित संस्था व पनवेल महानगरपालिका यांच्यामध्ये प्रस्तावित आहे.

iii. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७९ मध्ये महानगरपालिकेच्या स्थावर जंगम मालमत्तेचा विनियोग करणेबाबत तरतूद करण्यात आली आहे. ७९ (क) नुसार आयुक्तास, महानगरपालिकेच्या मंजुरीने, महानगरपालिकेच्या मालकीची कोणतीही स्थावर किंवा जंगम मालमत्ता पट्ट्याने देता येईल, विकता येईल, भाड्याने देता येईल किंवा अन्यथा अभिहस्तांतरित करता येईल. ७९ (ड) नुसार जो मोबदला घेऊन, महानगरपालिकेच्या मालकीची कोणतीही स्थावर मालमत्ता किंवा कोणताही हक्क विकता येईल, पट्ट्याने देता येईल, किंवा अन्यथा हस्तांतर करता येईल तो मोबदला, असे अधिमूल्य, भाडे किंवा अन्य मोबदला यांच्या चालू बाजार किमतीपेक्षा कमी असता कामा नये.

iv. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७९ (ग) नुसार **वैद्यकीय व शासकीय प्रयोजनासाठी** मुंबई सार्वजनिक विश्वस्थ व्यवस्था अधिनियम, १९५० अन्वये नोंदणीकृत सार्वजनिक न्यासाला किंवा नोंदणी अधिनियम, १८६० अन्वये किंवा महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० अन्वये नोंदणीकृत संस्थेस अथवा कंपनी अधिनियम, १९५६ अन्वये नोंदणीकृत कंपनीस बाजार मुल्यापेक्षा कमी दराने परंतु तीस वर्षापेक्षा अधिक होणार नाही इतक्या मुदतीकरीता शासनाच्या पूर्व मान्यतेने भाडे पट्ट्याने देण्याची तरतुद आहे.

v. अक्षय पात्र फाउंडेशन ही संस्था मुंबई सार्वजनिक विश्वस्थ व्यवस्था अधिनियम, १९५० (Indian Trust Act) अन्वये नोंदणीकृत सार्वजनिक न्यास आहे.

vi. मा.मुख्यमंत्री महोदयांकडे उपस्थित होणाऱ्या महापरिवर्तन कार्यक्रमात अक्षय पात्र फाउंडेशन या संस्थेसमवेत सामंजस्य करार करण्यात येणार आहे.

अक्षय पात्र फाउंडेशन या संस्थेस रुपये १/ प्रतीवर्ष इतक्या नाममात्र दराने भाडे पट्ट्याने देण्याच्या पनवेल महानगरपालिकेच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याबाबत पनवेल महानगरपालिकेकडून दिनांक १०.१२.२०१८ च्या प्राप्त प्रस्तावावर निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

उपरोक्त बाबींचा विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**<u>शासन निर्णय:-</u>**

अक्षय पात्र फाउंडेशन या सार्वजनिक न्यायास पनवेल महानगरपालिका क्षेत्रातील महानगरपालिकेच्या तत्कालीन पनवेल नगरपालिकेच्या शाळेतील तसेच जिल्हापरिषदेच्या शाळेतील विद्यार्थ्यांना मध्यान्ह भोजन योजना (शालेय पोषण आहार) नियमावली, २०१५ अंतर्गत मध्यान्ह भोजन उपलब्ध करुन देणार आहे. याकरीता केंद्रीय स्वयंपाकगृह स्थापन करण्यासाठी व या **<u>शैक्षणिक प्रयोजनार्थ</u>** महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७९ (ग) अनुसार पनवेल महानगरपालिकेच्या महासभेने दिनांक १९.११.२०१८ च्या ठरावान्वये निश्चित केलेली **<u>स.नं. ४८३/ १११/१ व सं.नं.४८३/९/३ या सर्वे नंबरपैकी अक्षय पात्र फाउंडेशन या संस्थेच्या सुलभतेनुसार सुमारे २००० चौ.मी.जागा</u>** अक्षय पात्र फाउंडेशन या संस्थेस रुपये १/ प्रतीवर्ष इतक्या नाममात्र दराने भाडे पट्ट्याने देण्याच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती :-</u>**

१. अक्षय पात्र फाउंडेशन संस्था पनवेल महानगरपालिकेच्या क्षेत्रातील महानगरपालिकेच्या शाळेतील तसेच जिल्हापरिषद शाळेतील १०,००० विद्यार्थ्यांना मध्यान्ह भोजन योजना (शालेय पोषण आहार) नियमावली, २०१५ अंतर्गत विद्यार्थ्यांना मध्यान्ह भोजन उपलब्ध करुन देत राहिल त्या दिवसापर्यंत / केंद्रीय स्वयंपाक घराचे काम सुरू असेपर्यंत अथवा १५ वर्षे, जे आधी घडेल ते, या कालावधीकरीता रुपये १/- प्रती वर्षी या सवलतीच्या दराने भाडेपट्टा अनुज्ञेय राहिल.

२. १५ वर्षांनंतर उक्त भाडेपट्ट्यास मुदतवाढ द्यावयाची असल्यास शासनाची फेरमंजुरी आवश्यक राहील.

३. पनवेल महानगरपालिका व अक्षय पात्र फाउंडेशन संस्था यांचेमधील भाडेपट्टा करारनाम्यातील अटी व शर्तींचा भंग झाल्याने पनवेल महानगरपालिकेने सदरचा करारनामा रद्द केल्यास सदर भाडेपट्टा समाप्त होईल. उक्त भूखंडावरील सर्व इमारती व इतर साधनसामुग्रीची मालकी विनामुल्य पनवेल महानगरपालिकेस हस्तांतरीत होईल.

४. तसेच भाडेपट्ट्याच्या मुदतीनंतर पनवेल महानगरपालिकेने / शासनाने उक्त भाडेपट्ट्यास मुदतवाढ न देण्याचा निर्णय घेतल्यास, सार्वजनिक बांधकाम विभाग या इमारती, साधनसामग्री, इतर चल व अचल मालमत्ता घसारा वजा जाता जे मुल्य निश्चित करेल ते मुल्य अक्षय पात्र फाउंडेशन संस्थेस अदा करून पनवेल महानगरपालिकेमार्फत या भूखंडावरील संकुलातील सर्व इमारती, साधनसामग्री, इतर चल व अचल मालमत्ता याचा ताबा घेईल.

५. सदर अटी व शर्ती पनवेल महानगरपालिका व अक्षय पात्र फाउंडेशन संस्थेच्या सामंजस्य करारामध्ये अंतर्भूत करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१९०१०४१७२९२८९१२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2019.01.04 17:34:18 +05'30'

**( अजित म.कवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, पनवेल महानगपालिका, जि. रायगड
५) उप सचिव (नवि-२३), नगर विकास विभाग यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महापालिका सचिव, पनवेल महानगपालिका
७) निवड नस्ती, नवि-२३.